"विनाअनुदान" "कायम विनाअनुदान" व
"स्वयंअर्थसहाय्यित" शाळांच्या धोरणाबाबत
स्पष्टीकरण.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.११६/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० जून, २०१७.

**संदर्भ :-** (१) मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथील रिट पिटीशन क्र.७६२/२०१५ मधील दिनांक ५ मे, २०१७ रोजीचा निर्णय,
(२) दिनांक २४ नोव्हेंबर, २००१ च्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णय,
(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : माशाअ-२००९/(५९९/०९) /माशि-१, दिनांक २० जुलै, २००९,
(४) "महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन),२०१२",
(५) शासन निर्णय , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.एसएसएन-२०१५/प्र.क्र.१६/ १५/टिएनटी-२, दिनांक २८ ऑगस्ट, २०१५,
(६) शासन निर्णय , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.ईडीई-२११६/प्र.क्र.२०/ एसएम-२, दिनांक २ मार्च, २०१७.

**शासन परिपत्रक :-**

मा. उच्च न्यायालय खंडपीठ , औरगाबाद येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्र. ७६२/२०१५ व इतर सलग्न याचिकांवर मा. उच्च न्यायालयाने दिनांक ५ मे, २०१७ रोजी निर्णय देतांना वाढीव पदांना मान्यता देण्याबाबत खालील प्रमाणे निरीक्षण नोंदविले आहे :-

" We do not find any defined policy laid down by the Government with regard to the sanction of additional posts and for giving grant to them. We expect the State Government to evolve a defined policy, keeping in view the provisions of section १२ of the Right to Education Act, thereby laying down the grant of additional posts, powers to grant additional posts so also eligibility for grant- in- aid and the period of entitlement of grant -in- aid for additional posts created."

मा.उच्च न्यायालयाच्या वरील निरिक्षणानुसार वाढीव तुकडया व वाढीव पदांबाबतचे अस्तित्वात असलेले धोरण स्पष्ट करणे आवश्यक आहे. ते खालील प्रमाणे स्पष्ट करण्यात येत आहे :-

२. राज्य शासनाची तत्कालीन आर्थिक स्थिती विचारात घेऊन, दिनांक २४ नोव्हेंबर, २००१ च्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये राज्यात नवीन प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना परवानगी देतांना "कायम विनाअनुदान" तत्वावर परवानगी देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार सन २००२ पासून राज्यात "कायम विनाअनुदान" तत्वावर शाळांना परवानगी देण्याचे धोरण सुरु झाले. याचा अर्थ नवीन शाळा, तुकडया व त्यावरील शिक्षक व

शिक्षकेत्तर कर्मचारी यांना देखील "कायम विनाअनुदान" तत्व लागू झाले. सदर शाळा भविष्यात कधीही शासनाकडे अनुदानाची मागणी करणार नाहीत अशा आशयाचे हमीपत्र लिहून घेऊनच सदर शाळांना परवानगी देण्यात आली होती.

३. सदर शाळांना अनुदान लागू करण्याची मागणी सर्व संबंधित घटकांकडून वारंवार शासनाकडे करण्यात येत होती. ही बाब विचारात घेऊन, शासन निर्णय दिनांक २० जुलै, २००९ अन्वये राज्यातील इंग्रजी माध्यम वगळता सुमारे २,००० प्राथमिक व २,००० माध्यमिक शाळांचा "कायम" शब्द वगळण्यात आला. तरी सुध्दा त्यापुढे विनाअनुदानित शाळा उघडण्याचा निर्णय घेण्यात आला नाही. त्यामुळे सन २००१ चा कायम विनाअनुदानित शाळा व तत्सम बाबींच्या निर्णयामध्ये कोणताही बदल झाला नाही. सन २००१ पासून विनाअनुदानित शाळा देण्याचे धोरण संपुष्टात आले आहे. मधल्या काळात बृहतआराखडा तयार करुन तेवढयाच शाळांपुरते विनाअनुदानित शाळा देण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला होता. तो निर्णय आता रद्द करण्यात आलेला आहे.

४. राज्यामध्ये दर्जेदार शिक्षण देण्यासाठी व शिक्षणाच्या सार्वत्रिकरणाकरीता कायम विना अनुदान तत्वावर नवीन प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना मान्यता देणे व विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्यासाठी "महाराष्ट्र स्वयंअर्थसहायित शाळा (स्थापना व विनियमन), २०१२ " हा अधिनियम दिनांक १९ जानेवारी, २०१३ पासून राज्यात अंमलात आला आहे.

५. दिनांक २० जुलै, २००९ ते दिनांक १९ जानेवारी, २०१३ या कालावधी दरम्यान मा. न्यायालयाच्या आदेशानुसार काही शाळांना विनाअनुदान तत्वावर परवानगी देण्यात आली असण्याची शक्यता आहे. अशा शाळांना विना अनुदान तत्वावरील शाळा समजण्यात याव्यात. या शिवाय काही शाळांना विनाअनुदानित तत्वावर परवानगी देण्यात आली असल्यास ही बाब शासनाच्या निदर्शनास आणण्यात यावी.

६. संचमान्यतेच्या संदर्भात शासन निर्णय दिनांक २८ ऑगस्ट, २०१५ नुसार तुकडी संकल्पना संपुष्टात आल्यामुळे ज्या वर्गामध्ये निकषापेक्षा अधिक विद्यार्थी आहेत तेथे जादा शिक्षक पद देण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. तसेच, अशा अतिरिक्त शिक्षकाने वर्ग भरविण्याकरिता त्या शाळेने अतिरिक्त खोली बांधल्यानंतरच ते पद भरण्याची परवानगी देण्याची तरतूद आहे. पुढील काळामध्ये इयत्ता १ ली ते ५ वी, इयत्ता ६ वी ते ८ वी व इयत्ता ९ वी ते १० वी च्या शाळांना नैसर्गिक वाढ राहणार नाही.

७. वरील वस्तुस्थिती व रिट पिटिशन क्र.७६२/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने विनाअनुदानित शाळांबाबतचे शासनाचे धोरण स्पष्ट नसल्याचे नमूद केल्याने विनाअनुदान तत्व व स्वयंअर्थसहाय्यित तत्व इत्यादी संज्ञांचे स्पष्टीकरण खालीलप्रमाणे देण्यात येत आहे. :-

**<u>७.१ विना अनुदानित शाळा</u> :-** "कायम" शब्द वगळण्यात आलेल्या शाळा या आता विनाअनुदानित शाळा राहतील. शासन निर्णय दिनांक २० जुलै, २००९ अन्वये राज्यातील

इंग्रजी माध्यम वगळता सुमारे २,००० प्राथमिक व २,००० माध्यमिक शाळांचा "कायम" शब्द वगळण्यात आला. काही प्रकरणात मा. न्यायालयाच्या आदेशानुसार विनाअनुदान तत्वावर परवानगी दिलेली असेल अशा शाळा विनाअनुदान तत्वावरील शाळा समजण्यात याव्यात या शिवाय काही शाळांना विनाअनुदानित तत्वावर परवानगी देण्यात आली असल्यास ही बाब शासनाच्या निदर्शनास आणण्यात यावी.

**<u>७. २ स्वयं अर्थसहाय्यित शाळा:-</u>** राज्यामध्ये दर्जेदार शिक्षण देण्यासाठी व शिक्षणाच्या सार्वत्रिकरणाकरीता "कायम विनाअनुदान" तत्वावर नवीन प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना मान्यता देणे व विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्यासाठी " महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन), २०१२ " हा अधिनियम दिनांक १९ जानेवारी, २०१३ पासून राज्यात अंमलात आला आहे. सदर अधिनियमानुसार ज्या शाळांना परवानगी देण्यात आलेली आहे त्या शाळांना भविष्यात केंव्हाही अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. दिनांक २० जुलै, २००९ च्या शासन निर्णयामध्ये इंग्रजी माध्यम वगळून अन्य माध्यमांच्या शाळांचा "कायम" शब्द वगळण्यात आला होता. तथापि, महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन), २०१२ " हा अधिनियम दिनांक १९ जानेवारी, २०१३ पासून अमंलात आल्यामुळे या सर्व इंग्रजी माध्यमाच्या शाळा स्वयंअर्थसहाय्यित शाळा समजण्यात याव्यात. त्यानुसार यु-डायस मध्ये तशा प्रकारची नोंद घेण्यात यावी.

८. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०६२०१७३३५८३७२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.06.20 17:30:23 +05'30'

**( नंदकुमार )**

प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय, मुंबई,

२) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,

४) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५) मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव,मंत्रालय, मुंबई,

६) मा.प्रधान सचिव (शा.शि.व क्री.) यांचे स्वीय सहायक,

७) आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य, पुणे,

८) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे,

९) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,

१०) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,

११) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) सर्व जिल्हा परिषदा,

१२) शिक्षण निरीक्षक (पश्चिम/उत्तर/दक्षिण) बृहन्मुंबई,

१३) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी शालेय शिक्षण विभाग,

१४) निवडनस्ती (एसएम-४).